सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता ३६, सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली उर्वरित निधी वितरीत करण्याबाबत....
वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित)

**महाराष्ट्र शासन**

**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : वनाम -२०२१/प्र.क्र. ३८/ महामंडळे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ३० मार्च, २०२२**

**वाचा :** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८ /अर्थ-३, दि.६.४.२०२१
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९
३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक : २७ ऑगस्ट, २०२१
४) शासन निर्णय समक्रमांक दिनांक : २ डिसेंबर, २०२१
५) शासन निर्णय समक्रमांक दिनांक : १० मार्च, २०२२

**शासन निर्णय**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या. यासाठी ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली रु.८,०५,१९,०००/- (अक्षरी रुपये आठ कोटी पाच लक्ष एकोणवीस हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून संदर्भ क्र. ३ ते ५ येथे नमूद शासन निर्णयान्वये महामंडळास ९५ % च्या मर्यादेत रु.७,६४,९३,०५०/- (अक्षरी रुपये सात कोटी चौसष्ट लक्ष त्र्याण्णव हजार तीस फक्त) इतके ३६- सहायक अनुदान (वेतन) वितरीत करण्यात आले आहे.

२. वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळाकरीता सन २०२१-२२ या वित्तीय वर्षाकरीता ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली मंजूर आर्थिक तरतूदीपैकी उर्वरित ५ टक्केच्या मर्यादेत एकूण रु. ४०,२५,९५० /- (अक्षरी रुपये चाळीस लक्ष पंचवीस हजार नऊशे पन्नास फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. योजनांतर्गत निधीतील खर्चासाठी शासनाने ठरविलेले निर्बंध काटेकोरपणे अंमलात आणावेत. तसेच, ज्या योजनेसाठी निधी मंजूर करण्यात आला आहे, त्याच योजनेसाठी निधी खर्च करण्यात यावा.
२. व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.
३. विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती व त्यावर केलेला खर्च याची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

४. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.
५. महामंडळाने कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी प्रयत्न करावेत.
६. सदर योजनेचा निधी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासण्याच्या अधीन वितरीत करण्यात येत आहे.
७. उपरोक्त निधीचा खर्च करतांना संबंधित अधिकाऱ्यांनी सर्वसाधारण वित्तीय नियम, योजनेच्या अटी व शर्ती, CVC मार्गदर्शक सूचना, CAG निरीक्षणे इ. अनुपालन करून निधीचा विनियोग करावा.
८. संदर्भ क्र. १ व २ येथे नमूद परिपत्रकातील प्रत्येक अटींची पूर्तता महामंडळाकडून करण्यात यावी.
९. परिपत्रकातील सूचनेनुसार वेतन अनुदान अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत वेतन अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व offline पध्दतीने वितरीत करण्यात येऊ नये.

**३.** वरील अनुदानाबाबत उप सचिव (रोखशाखा), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम आहरित करण्यासाठी, कक्ष अधिकारी (रोखशाखा), आहरण व संवितरण अधिकारी, विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना घोषित करण्यात आले आहे. त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४ मधील नमुन्यातील देयकान्वये वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ (मर्यादित), मुंबई यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

**४.** या बाबीवरील खर्च मागणी क्र. झेडजी-३, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०२) विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाला अनुदान (०२) (०१) विमुक्त जाती भटक्या जमाती विकास महामंडळाला सहाय्यक अनुदान (अनिवार्य) **(**२२२५ ई ८४८**)**, ३६, सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**५.** सदर शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि. ६ एप्रिल, २०२१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३०१७४३४२६५३४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VARSHA SUNIL
SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba, serialNumber=af4e3a3aadaca1026547ef614df4de89d66994806d3760116b32bb3aadeaf9fb, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2022.03.30 17:45:55 +05'30'

**( व.सु.सामंत )**

**कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ मर्या., मुंबई.

३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.

४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.

५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.

६) वित्त विभाग (कार्यासन व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ) मंत्रालय, मुंबई.

७) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.

८) कक्ष अधिकारी (रोखशाखा / अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती (महामंडळे)